**नवीन दरवाजेयुक्त खोडशी बंधारा, ता.कराड, जि.सातारा या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक: खोडशी ०४१३/प्र.क्र.२५१/१३/मोप्र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- ११ जून, २०१८

**पहावे:-** शासन निर्णय क्र.एफडी डब्ल्यू/१०७६/३३०७/११५८आयएमजी-२, मंत्रालय, मुंबई दि.२६/०९/१९७८

**प्रस्तावना :**

नवीन दरवाजेयुक्त खोडशी बंधारा, जि. सातारा हा प्रकल्प महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळातर्गत सर्वसाधारण क्षेत्रातील असून कृष्णा नदीवर मौजे खोडशी, जि. सातारा येथे प्रस्तावित आहे. या बंधाऱ्याचे ठिकाणी सुमारे १५० वर्षापूर्वी वळवणीचा बंधारा बांधलेला असून या बंधाऱ्याच्या डाव्या तिरावरून ८६ कि.मी. लांबीच्या कृष्णा कालव्याव्दारे ११,२९४ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होत आहे. हा पूर्वी बांधलेला बंधारा पूर्णपणे गाळाने भरलेला असल्यामुळे या बंधाऱ्याच्या लगतच खालील बाजूस (D/S) ३५ मी. अंतरावर नवीन दरवाजेयुक्त बंधारा बांधण्याचे प्रस्तावित आहे. या बंधाऱ्याची एकूण लांबी २४९ मी. असून यामध्ये १२ मी. लांबीचे एकूण १७ गाळे आहेत. यामध्ये १२ X ५ मी. आकाराचे १७ वक्राकार दरवाजे आहेत.

प्रकल्पांर्तगत फक्त द्वारयुक्त वळवणीचा बंधारा बांधण्याचे प्रस्तावित असून यापासून निघणाऱ्या कृष्णा कालव्याखालील ११,२९४ हे. सिंचन क्षेत्रासाठी ५.७ अ.घ.फू. पाणी आवश्यक असून हे पाणी खोडशी बंधाऱ्याच्या मुक्त पाणलोट क्षेत्रातून व वरचे बाजूस अस्तित्वात असलेल्या धोम व कण्हेर प्रकल्पाच्या समादेश क्षेत्रातून निर्माण होणाऱ्या पुनरूद्भवनातून (Regeneration flow) उपलब्ध होणार आहे.

सदर योजनेस शासनाने सन १९७८ मध्ये रु.२.२३ कोटी इतक्या किंमतीस (दरसूची १९७७-७८) मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती.

तथापि, बांधकामाचे दरम्यान दरसूचीतील बदलामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृतीमुळे, भूसंपादनाच्या किंमतीतील वाढीमुळे, सविस्तर संकल्पनानुसार तरतूदी केल्यामुळे, इतर कारणामुळे व अनुषंगीक खर्चामुळे प्रकल्प किंमतीत वाढ झाली. त्यामुळे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास मान्यतेस्तव सादर केला होता.

प्रकल्प अहवालावर दि. १५/२/२०१८ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीचे बैठकीत चर्चा झाली . व्यय अग्रक्रम समितीने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमिमांसा, प्रकल्पातील उर्वरित कामाचा परामर्श घेऊन खोडशी बंधाऱ्यापासून निघणाऱ्या कृष्णा कालव्यावरील ११,२९४ हे. क्षेत्र अबाधित राहणेसाठी नवीन दरवाजेयुक्त खोडशी बंधा-याचे काम पूर्णत्वास नेण्याच्या उद्देशाने, जलसंपदा विभागाची सन २०१३-१४ची दरसूची व सार्वजनिक बांधकाम विभागाची सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित रुपये २७.९४ कोटी इतक्या किमंतीच्या प्रथम सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा जाणीवपूर्वक निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

नवीन दरवाजेयुक्त खोडशी बंधारा, जि. सातारा, या प्रकल्पाच्या जलसंपदा विभागाची सन २०१३-१४ची दरसूची व सार्वजनिक बांधकाम विभागाची सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित रुपये २७.९४ कोटी (रुपये सत्तावीस कोटी चौ-यान्नव लक्ष फक्त) [प्रत्यक्ष कामासाठी रुपये २७.४२ कोटी (रुपये सत्तावीस कोटी बेचाळीस लक्ष) व अनुषंगीक खर्च रुपये ०.५२ कोटी (रुपये बावन्न लक्ष)] इतक्या किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) राज्यस्तरिय तांत्रिक सल्लागार समिती च्या अहवालातील मुद्यांची पूर्तता करावी.

२) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

३) प्रकल्प नियोजनानुसार व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावा.

४) संपुर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणीवापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणीवापर संस्थेस हस्तांतरीत करावे.

५) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वितीकरणाचे विविध टप्प्यावर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असे गृहीत धरता येणार नाही.

प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा परिशिष्ट “अ” मध्ये सोबत जोडला आहे.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०)सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरित महाराष्ट्र) (संगणक संकेतांक ४७०१ एच-६२९) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१४४/१४३४,दि.२०/७/२०१७ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२२४/व्यय-१२,दि.१५/९/२०१७ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि.१५.०२.२०१८ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१११५४११४७२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2018.06.11 15:49:27 +05'30'

**सहपत्र: परिशिष्ट “अ”**

**(शरद दाभाडकर)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

## परिशिष्ट "अ"

नवीन दरवाजेयुक्त खोडशी बंधारा, जि. सातारा, या प्रकल्पाच्या प्रथम सु.प्र.मा. नुसार उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा

**(रक्कम रु. कोटी मध्ये)**

| उपशिर्ष | मंजूर मूळ प्रमानुसार | प्रथम सुप्रमा नुसार | वाढ/घट | मार्च २०१६ अखेर झालेला खर्च | उर्वरीत किंमत |
|---|---|---|---|---|---|
| अे प्राथमिक | ०.०१ | ०.०१ | ०.०० | ०.०१ | ०.०० |
| बी- भूसंपादन | ०.०१ | ०.१५ | ०.१४ | ०.१४ | ०.०१ |
| सी-कामे | १.८८ | २६.३१ | २४.४२ | २०.९२ | ५.३९ |
| के-इमारत | ०.०२ | ०.२८ | ०.२६ | ०.२८ | ०.०० |
| एम-वनीकरण | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ओ-संकीर्ण | ०.०१ | ०.५८ | ०.५७ | ०.१२ | ०.४६ |
| पी- देखभाल | ०.०० | ०.०१ | ०.०० | ०.०१ | ०.०० |
| क्यू स्पेशल टी.पी. | ०.०३ | ०.०२ | ०.०० | ०.०२ | ०.०० |
| आर दळणवळण | ०.०३ | ०.०७ | ०.०४ | ०.०७ | ०.०० |
| आनुषंगीक खर्च | ०.२४ | ०.५२ | ०.२९ | ०.०० | ०.५२ |
| **एकूण** | **२.२३** | **२७.९४** | **२५.७१** | **२१.५६** | **६.३८** |